मा.उच्च न्यायालयामध्ये शासनाच्या वतीने किमान विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांच्या स्वाक्षरीने प्रतिज्ञापत्र दाखल करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः न्यायाप्र २०१४/प्र.क्र.५३९/१४/वि.शि.-१,**

**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२**

**तारीख: १५ डिसेंबर, २०१४**

**प्रस्तावना —**

मा.उच्च न्यायालयामध्ये शासनाच्या वतीने अथवा क्षेत्रीय कार्यालयाच्या वतीने दाखल करण्यात येणारी प्रतिज्ञापत्रे ही कक्ष अधिकारी/मामलेदार इ. दर्जाच्या अधिका-याच्या स्वाक्षरीने दाखल करण्यात येतात, याबाबत मा.उच्च न्यायालयाने नाराजी व्यक्त केली असून मा.उच्च न्यायालयात दाखल करण्यात येणारी प्रतिज्ञापत्रे ही उपसचिव किंवा उपसचिव पदापेक्षा जास्त दर्जाच्या पदावरील अधिका-याच्या स्वाक्षरीने दाखल करण्यात यावीत, असे निर्देश दिल्याचे महाधिवक्ता यांनी कळविले आहे.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भात मा.उच्च न्यायालयात दाखल झालेल्या याचिकांच्या अनुषंगाने शासनाच्या वतीने प्रतिज्ञापत्र दाखल करण्यासाठी अनेक वेळा संचालक अथवा विभागीय सहसंचालक यांना प्राधिकृत करण्यात येते. शासनाच्या वतीने अशा प्रकारे प्राधिकृत केल्यानंतर संचालक अथवा विभागीय सहसंचालक यांच्याकडून प्रतिज्ञापत्र दाखल करण्यासाठी प्रशासकीय अधिका-यांना प्राधिकृत करण्यात येते. अशा प्रकारे दाखल करण्यात येणारी प्रतिज्ञापत्रे ही मा.उच्च न्यायालयाच्या उक्त निर्देशास अनुसरुन नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यामुळे मा.उच्च न्यायालयात शासनाच्या वतीने अथवा क्षेत्रीय कार्यालयाच्या वतीने प्रतिज्ञापत्र दाखल करताना कोणत्या अधिका-याच्या स्वाक्षरीने दाखल करण्यात यावे याबाबतचे निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक —**

३. वरील प्रस्तावनेमध्ये नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता शासन व क्षेत्रीय कार्यालयांमध्ये न्यायालयीन प्रकरणांच्या बाबतीत आवश्यक तो समन्वय ठेवण्याच्या अनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे :-

( i ) मा.उच्च न्यायालयात शासनाच्या अथवा क्षेत्रीय कार्यालयाच्या वतीने दाखल करण्यात येणारे प्रतिज्ञापत्र यापुढे प्रशासकीय अधिकारी यांच्या स्वाक्षरीने दाखल करण्यात येऊ नये.

( ii ) मा.उच्च न्यायालयात शासनाच्या अथवा क्षेत्रीय कार्यालयाच्या वतीने दाखल करण्यात येणारे प्रतिज्ञापत्र किमान विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांच्या स्वाक्षरीने दाखल करण्यात यावे.

४. सदरचे परिपत्रक विधी व न्याय विभागाचे दि.१६/०९/२००९ च्या टिप्पणीतील निर्देश, महाधिवक्ता यांचे क्र.एजी/२९२/२००९, दि.१४ जुलै, २००९ आणि विधी व न्याय विभागाच्या दि.१८/०८/२००९ च्या टिप्पणीतील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१५११४५५२३६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikas Thulshiram Kadam

Digitally signed by Vikas Thulshiram Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vikas Thulshiram Kadam
Date: 2014.12.22 11:46:31 +05'30'

**( विकास तु. कदम )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व सह सचिव/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे
४. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
५. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय
६. प्रधान सचिव (उ.व तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
७. निवड नस्ती